श्री.माणिक नाथा शहाराव यांचा
दि.२९/०८/२००४ रोजी झालेल्या
मृत्यू प्रकरणी नुकसान भरपाई
देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्र.एचआरसी-३२००५/प्र.क्र.५४/पोल-१४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि.२८ सप्टेंबर, २००५.

**वाचा :-**
१) राज्य मानवी हक्क आयोगाचे पत्र क्र .एसएचआरसी -९/२००४/प्र.क्र.९/ प्र.शा/६९९५, दि.१९/०१/२००५.
२) सचिव, राज्य मानवी हक्क आयोग यांचे पत्र क्र.एसएचआरसी/एसी/०४/ ०५/५९७, दि.०७/०४/२००५.

**प्रस्तावना :-**

एमआयडीसी पैठण (जि.औरंगाबाद) पोलीस ठाणे येथील गु.र.क्र.७५/०४ च्या तपासकामी माणिक नाथा शहाराव, रा.वाहेगांव यांची दिनांक २७/०८/२००४ रोजी चौकशी करण्यात येवून दुस-या दिवशी पोलीस ठाण्यात पुन्हा येण्यास सांगितले. तथापि दि.२८/०८/२००४ रोजी तो विषारी पदार्थाचे प्राशन करुन पोलीस ठाण्यात आल्याचे आढळून आल्याने त्यास औषधोपचाराकरिता तात्काळ शासकीय रुग्णालयात दाखल करण्यात आले. तेथे औषधोपचार सुरु असतांना दि.२९/०८/२००४ रोजी त्याचे निधन झाले. सदर मृत्यू प्रकरणाचा तपास राज्य गुन्हे अन्वेषण विभागाकडून करण्यात आला.

सदर बाब राज्य मानवी हक्क आयोगाने त्यांचेकडील सुओ-मोटो प्रकरण क्रमांक ९/०४ अन्वये दाखल करुन घेतली व मानव हक्क संरक्षण अधिनियम, १९९३ च्या कलम १८(३) मधील तरतूदीनुसार मयताच्या पत्नीस रु.१०,०००/- इतकी नुकसान भरपाई देण्याबाबत तसेच संबंधीत घटनेस जबाबदार अधिकारी / कर्मचारी यांचे विरुध्द विभागीय चौकशी करण्याबाबत शासनाकडे दि.१९/०१/२००५ रोली प्रथमतः शिफारस केली होती. तद्नंतर या प्रकरणी आयोगाने पुनर्विचार केला असता, दि.१९/०१/२००५ रोजी केलेल्या शिफारशी पैकी फक्त आर्थिक सहाय्य करण्याचाच वरील निर्णय दि.२९/०३/२००५ रोजी कायम ठेवला.

**शासन निर्णय :-**

सदर प्रकरणी राज्य मानवी हक्क आयोगाने त्यांचे दि.२९/०३/२००५ च्या निकालपत्रात केलेल्या शिफारशीनुसार मयत माणिक नाथा शहाराव यांचे पत्नीस रु. १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) इतकी नुकसान भरपाई अदा करण्यास शासन

याद्वारे मंजूरी देत आहे. सदर रक्कम अदा करण्याची कार्यवाही पोलीस अधिक्षक, औरंगाबाद (ग्रा.) यांनी करावी.

याबाबत होणारा खर्च " २०५५ पोलीस १०९ जिल्हा पोलीस-१०९ (००) (०१) जिल्हा पोलीस दल-२० इतर खर्च भारित (संगणक क्र.२०५५०१५९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून तो सन-२००५-२००६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-३७२/०५/व्यय-७, दि.०६/०९/२००५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

( सं.द.माने )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस महासंचालक (मानवी हक्क), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
जिल्हादंडाधिकारी, औरंगाबाद.
पोलीस अधिक्षक, औरंगाबाद (ग्रा.)
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
कोषागार अधिकारी, औरंगाबाद
वित्त विभाग (व्यय-७)
निवड नस्ती.